**महाराष्ट्र न्यायिक अकादमी आणि भारतीय मध्यस्थी केंद्र व प्रशिक्षण संस्था, उत्तन, जिल्हा ठाणे येथील आस्थापनेवरील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्रमांक : न्याअप्र १५२३/प्र.क्र.२२/का.९**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,

दिनांक :- १० मार्च,२०२५.

**पहा-** १) महाराष्ट्र न्यायिक अकादमी आणि भारतीय मध्यस्थी केंद्र व प्रशिक्षण संस्था, उत्तन, जि. ठाणे यांचे पत्र क्र.एमजेए/यु/२५/२०२५, दि.२९.०१.२०२५.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५

**प्रस्तावना :**

संदर्भ क्र. १ अन्वये उप संचालक, महाराष्ट्र न्यायिक अकादमी आणि भारतीय मध्यस्थी केंद्र व प्रशिक्षण संस्था, उत्तन, जि. ठाणे यांनी त्यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे. संदर्भ क्र. २ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार महाराष्ट्र न्यायिक अकादमी आणि भारतीय मध्यस्थी केंद्र व प्रशिक्षण संस्था, उत्तन, जि. ठाणे येथील ५२ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र न्यायिक अकादमी आणि भारतीय मध्यस्थी केंद्र व प्रशिक्षण संस्था, उत्तन, जि. ठाणे यांच्या आस्थापनेवरील सोबतच्या परिशिष्ट 'अ' मध्ये दर्शविलेल्या एकूण ५२ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

२.	याकरिता येणारा खर्च "मागणी क्रमांक जे-१, २०१४, न्यायदान, (०५) (०१) न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था (संकेतांक क्रमांक २०१४ ०२०७) ०१ वेतन" या लेखाशिर्षाखाली संबंधित वित्तीय वर्षासाठी मंजुर होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

३.	वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५ द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**४.**	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२५०३१०१७३०५७७२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढ़ण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHILPA DILIP GAIKWAD

Digitally signed by SHILPA DILIP GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Law and Judiciary Department,
2.5.4.20=087014bd7de0d3d28bc50a76e6183c9a63857b3391f4b1f66149b3ed7bf84ef2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=e366bed26d5b71bce1df85a689815924b8cc3d6a61e23fdc7aecad83968ce1f3, cn=SHILPA DILIP GAIKWAD
Date: 2025.03.10 17:32:32 +05'30'

**(शि.दि. गायकवाड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२) महाराष्ट्र न्यायिक अकादमी आणि भारतीय मध्यस्थी केंद्र व प्रशिक्षण संस्था, उत्तन-गोराई रोड, भाईदर(प.), जिल्हा-ठाणे ४०११०६.
३) महालेखापाल-एक (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई,
४) महालेखापाल-एक ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र,मुंबई,
५) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे,
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई ,
७) वित्त विभाग व्यय-५,
८) विधी व न्याय विभाग कार्यासन-२३, २४ व २५
९) निवड नस्ती /का.

**शासन निर्णय, विधी व न्याय विभाग क्रमांक न्याअप्र १५२३/प्र.क्र.२२/का. नऊ**
**दिनांक : १०मार्च,२०२५ सोबतचे परिशिष्ट "अ"**

महाराष्ट्र न्यायिक अकादमी आणि भारतीय मध्यस्थी केंद्र व प्रशिक्षण संस्था, उत्तन, जिल्हा ठाणे

| **अ. क्र.** | **पदनाम** | **मंजूर केलेल्या पदांची संख्या** | **पद निर्माण करण्यात आलेल्या शासननिर्णयांचा क्रमांक व दिनांक** |
|---|---|---|---|
| १ | संचालक. | १ | जेओटी १००९/प्र.क्र.४५/का-९, दि. ३१ ऑगस्ट, २००९ |
| २ | सह संचालक. | २ | -!!- |
| ३ | अतिरिक्त संचालक. | ३ | -!!- |
| ४ | *प्रशासकीय अधिकारी | १ | -!!- |
| ५ | सहाय्यक संचालक. | १ | -!!- |
| ६ | प्रभारी अधिकारी-आस्थापना | १ | शासन निर्णय, क्र.न्याअप्र १५१७/प्र.क्र.२६३/का.९, दि.२०.०९.२०१९ |
| ७ | संचालकांचे स्वीय सचिव (निवडश्रेणी लघुलेखक) | १ | -!!- |
| ८ | आय.टी. प्रकल्प व्यवस्थापक व निदेशक | १ | -!!- |
| ९ | *कक्ष अधिकारी | २ | जेओटी १००९/प्र.क्र.४५/का-९, दि. ३१ ऑगस्ट, २००९ आणि न्याअप्र १५१५/प्र.क्र.१७५/का.9, दि.०४.०९.२०१८ |
| १० | लेखा अधिकारी | १ | -!!- |
| ११ | मुख्य ग्रंथपाल | १ | -!!- |
| १२ | सहाय्यक ग्रंथपाल | १ | -!!- |
| १३ | निम्नश्रेणी लघुलेखक | ४ | -!!- |
| १४ | *सहाय्यक | ६ | जेओटी १००९/प्र.क्र.४५/का-९, दि. ३१ ऑगस्ट, २००९ आणि न्याअप्र १५१५/प्र.क्र.१७५/का.9, दि.०४.०९.२०१८ |

| | | | |
|---|---|---|---|
| १५ | लिपिक टंकलेखक | ८ | -!!- |
| १६ | वाहन चालक | ४ | न्याअप्र १५१४/प्र.क्र.०२/का-९, दि. ०५.०५.२०१४ |
| १७ | शिपाई | १४ | जेओटी १००९/प्र.क्र.४५/का-९, दि. ३१.०८.२००९आणि न्याअप्र १५१५/प्र.क्र.१७५/का.9, दि.०४.०९.२०१८ |
| १८ | पुस्तक बांधणीकार | या पदाची कामे बाहय स्त्रोतांकडुन (Out Sourcing) करुन घेण्यात यावी. | -!!- |
| १९ | स्वयंपाकी | या पदांची कामे बाहय स्त्रोतांकडुन (Out Sourcing) करुन घेण्यात यावी. | -!!- |
| २० | पहारेकरी | या पदांची कामे बाहय स्त्रोतांकडुन (Out Sourcing) करुन घेण्यात यावी. | -!!- |
| २१ | सफाईगार | या पदांची कामे बाहय स्त्रोतांकडुन (Out Sourcing) करुन घेण्यात यावी. | -!!- |
| २२ | माळी | या पदांची कामे बाहय स्त्रोतांकडुन (Out Sourcing) करुन घेण्यात यावी. | -!!- |
| | एकुण पदे | **५२** | |

*वसतिगृह अधिक्षक(वॉर्डन)चे काम प्रशासकीय अधिकारी किंवा कक्ष अधिकारी किंवा सहायक यांना उपरोक्त विवरणपत्रातील अनुक्रमांक १४ येथील ३सहायक पदांपैकी १ सहायक "वसतीगृह भांडारपाल"म्हणून काम पाहतील. तसेच अणुक्रमांक १७ येथील १४ शिपाई पदांपैकी २ शिपाई "ग्रंथपाल परिचर" म्हणून काम पाहतील.

---------------------